**बाल न्याय ( मुलांची काळजी व संरक्षण ) अधिनियम, २०१५ च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी बाल न्याय संगणकीय प्रणाली ( Juvenile Justice Information System ) तयार करण्यासाठी आलेल्या खर्चाचे देयक अदा करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. आस्था-२०२१/प्र.क्र.६१/का.०१**

नविन प्रशासन भवन, ३ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २२/०२/२०२३

**वाचा:-१. महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.ICPS/प्र.क्र.३११/का-०८, दि.२३/०३/२०२१.**
**२. महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.ICPS/प्र.क्र.३११/का-०८, दि.११/१०/२०२१.**
**३. महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.आस्था/प्र.क्र.६१(१)/का-१, .१८/११/२०२१.**
**४. महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.आस्था/प्र.क्र.६१/का-१, .१७/१२/२०२१.**
**५. महाआयटी यांचे Ref No. MH-IT/OW/११२२/०२३७४, दि.२१.११.२०२२**

**प्रस्तावना :**

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या सनियंत्रणासाठी मा.न्यायमुर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली बाल न्याय समिती गठीत करण्यात आली आहे. मा. उच्च न्यायालयांतर्गत गठीत बाल न्याय समितीने बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी समग्र संगणकीय प्रणाली विकसीत करण्याची सूचना शासनास केली होती. त्यानुसार बाल न्याय अधिनियमाच्या प्रभावी अंमलबजावणीच्या अनुषंगाने सर्व कामकाज ऑनलाईन करणे, माहिती संकलित करणे, माहितीचे सनियंत्रण करणे यासाठी संगणकीय प्रणाली तयार करण्यात आली आहे. सदरील प्रणालीमध्ये विधीसंघर्षग्रस्त बालक आणि काळजी व संरक्षणाची गरज असलेली बालके यासंबंधीत अनुक्रमे कार्यरत यंत्रणा बाल न्याय मंडळ व बाल कल्याण समितीसाठी दोन स्वतंत्र मॉड्युल विकसीत करण्यात आले आहेत. सदरील दोन मॉड्युलपैकी बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या प्रभावी अंमलबजावणीसाठी महिला व बाल विकास विभागाकडून तयार करण्यात आलेली बाल न्याय संगणकीय प्रणाली ( Juvenile Justice Information System ) मधील विधीसंघर्षग्रस्त बालकांसंबंधीत मॉड्युल संदर्भ क्र. ०१ नुसार लागू करण्यात आले आहे. सदरील प्रणाली www.jis.maharashtra.gov.in या लिंकवर उपलब्ध करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ नुसार सदर संगणकीय प्रणाली तयार करण्याच्या

महाऑनलाईनच्या रु.२.३८ कोटीच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. ०३ अन्वये इ. गव्हर्नन्स प्रकल्पांची अंमलबजावणी (२२५१०८७५) या लेखाशिर्षांतर्गत १७ संगणक खर्च या उद्दीष्टासाठी प्रात एकूण रु. १.०० कोटीच्या तरतूदीमधून त्यासाठी रू. २०.१० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यात आला आहे. बाल न्याय संगणकीय प्रणाली ( Juvenile Justice Information System) तयार करण्यासाठी महा-आयटी या संस्थेकडून रू.५४,६५,७१०/- इतक्या रकमेचे देयक सादर करण्यात आले असून त्यासाठी बाबीसाठी उपलब्ध करून देण्यात आलेला रु.२०.१० लक्ष इतका निधी संदर्भ क्र. ३ शासन निर्णयान्वये महा-आयटी या संस्थेला अदा करण्यात आला आहे. बाल न्याय संगणकीय प्रणाली ( Juvenile Justice Information System ) तयार करण्यासाठी महा-आयटी या संस्थेकडून रू. ७४,७५,५९९.३४/- इतक्या रकमेचे देयक सादर करण्यात आले होते. सदर देयक अदा करण्याच्या अनुषंगाने रू.७४, ७५.५९९.३४/- इतका निधी संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली द्वारे, वितरित करण्यात आला आहे. संदर्भ क्र.५ नुसार जे.जे.आय.एस. पोर्टल साठी माहे नोव्हे-२०२१ ते सप्टे-२०२२ या कालावधीत पूरविण्यात आलेल्या क्लाऊड सेवेसाठी एकूण रु.८,९५,३५८/- इतक्या रकमेची देयके सादर केली असून सदर देयके अदा करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

बाल न्याय संगणकीय प्रणाली ( Juvenile Justice Information System ) पोर्टल साठी माहे नोव्हे-२०२१ ते सप्टे-२०२२ या कालावधीत पूरविण्यात आलेल्या क्लाऊड सेवेसाठी एकूण रु.८,९५,३५८/- इतक्या रकमेची देयके सादर केली असून सदर देयके अदा करण्याच्या अनुषंगाने रु.८,९५,३५८/- इतका निधी महा-आयटी संस्थेच्या खाते क्र. **005710110004699** मध्ये जमा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक X-२, २२५१ सचिवालय सामाजिक सेवा (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्प, (०१) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम), १७ संगणक खर्च ( २२५१ ०८७५ ) अंतर्गत सन २०२२-२३ या वर्षी उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०२२४१८०६४०९५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by JAHANGIR KYAMUDDIN KHAN
Date: 2023.02.28 12:14:03 +05'30'

**( जहांगीर खान )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (महिला व बाल विकास) मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (महिला व बाल विकास) मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मंबई.
७. मा. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सह/उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.कक्ष अधिकारी-अर्थसंकल्प शाखा, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
१२.कक्ष अधिकारी-रोख शाखा, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
१३.निवडनस्ती-का १.